जुलै, २०२१ मध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पुरपरिस्थिमुळे शेतीपिकांच्या नुकसानीकरिता आर्थिक मदत वाटप करण्यासाठी निधी वितरित करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०७ मार्च, २०२२

वाचा : १) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१५/प्र.क्र.४० /म -३, दिनांक १३.०५.२०१५
२) शासन निर्णय, क्रमांक : सीएलएस-२०१७/प्र.क्र.२६७ /म -३, दिनांक २५.०१.२०१८
३) शासन निर्णय क्रमांक सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म -३, दिनांक ११.०८.२०२१
४) शासन निर्णय क्रमांक सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म -३, दिनांक १६.०९.२०२१
५) शासन निर्णय, क्रमांक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२०३/म-३, दि.०६.१०.२०२१
६) शासन निर्णय, क्रमांक :- सीएलएस-२०२१/प्र.क्र.२४२/म-३, दि.२१.१०.२०२१

प्रस्तावना:

जुलै, २०२१ मध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेलया पुररिस्थितीमुळे राज्यातील काही जिल्हयांमध्ये नागरिकांच्या मालमत्तेचे नुकसान झाले आहे. या पुरपरिस्थितीमुळे झालेल्या नुकसानीसाठी मदत देण्याबाबत दिनांक ०३.०८.२०२१ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णयानुसार संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये मदतीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दरानुसार तसेच संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या दरानुसार बाधितांना संदर्भाधीन क्र.४ व ५ च्या शासन निर्णयाअन्वये मदत निधी वितरीत करण्यात आला आहे. आता, संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये जुलै ते ऑक्टोबर, २०२१ या कालावधीमध्ये अतिवृष्टी व पुरा यामुळे बाधित झालेल्या शेतीपिकांकरिता वाढीव दराने मदत देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार राज्य निधीमधून जुलै, २०२१ मध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे शेतीपिकांच्या झालेल्या नुकसानीकरिता बाधित नागरिकांना निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:

जुलै, २०२१ मध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे राज्यात विविध जिल्हयात उद्भवलेल्या पुरपरिस्थितीमुळे शेतीपिकांच्या झालेल्या नुकसानीकरिता बाधित नागरिकांना मदतीचे वाटप करण्याकरिता वाढीव दराने राज्य निधीमधून सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्यानुसार एकुण **रु.१२५०७.०१ लाख (अक्षरी रुपये एकशे पंचवीस कोटी सात लाख एक हजार फक्त)** इतका निधी विभागीय आयुक्त यांचेमार्फत जिल्हयांना वितरीत करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्राप्रमाणे लेखाशीर्षनिहाय निधी बीम्स प्रणालीवर विभागीय आयुक्त यांना कार्यासन म-११ यांनी तात्काळ वितरित करावा.

३. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन सर्व शासन निर्णयातील सूचनांचे व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

४. या शासन निर्णयान्वये संपूर्ण रक्कम बीम्स प्रणालीवर वितरित करण्यात येत असली तरी, लाभार्थी निश्चित झाल्यानंतर वित्तिय शिस्तीच्या दृष्टीकोनातून संबंधित जिल्हाधिकारी यांनी प्रत्यक्ष गरजेनुसारच कोषागारातून रक्कम आहरित करून त्यानंतरच रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये थेट ऑनलाईन पध्दतीने हस्तांतरित करण्यात यावी. सदर निधी अनावश्यकरित्या कोषागारातून आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. **लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा** तसेच राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च करण्यात येणाऱ्या निधीची माहिती केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने विकसित केलेल्या NDMIS या प्रणालीमध्ये नोंदविण्यात यावी. सर्व सुचनांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील.

५. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून तसेच राज्य शासनाच्या निधीमधून उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास तसेच महालेखापाल यांना सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

६. वरील प्रयोजनासाठी प्रधान मागणी क्रमांक सी-६, प्रधान लेखाशीर्ष २२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणार्थ सहाय्य, ०२, पूर, चक्रीवादळे इत्यादी, १०१, अनुग्रह सहाय्य (९१) **राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च**, (९१)(०५) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना सहाय्य ,३१ सहाय्यक अनुदाने **( २२४५ २४५२)** व प्रधान लेखाशीर्ष २२४५ - (९१)(०६) नैसर्गिक आपत्तीमुळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत (अनिवार्य), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२४५ २३०९) या लेखाशीर्षाखाली सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेप्रमाणे निधी उपलब्ध करून देण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ०८/२०२२/व्यय-९, दिनांक २०.०१.२०२२ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०३०७१३२९१२८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2022.03.07 15:51:16 +05'30'

**( संजय औ. धारूकर )**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन,मुंबई

३. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई
५. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
६. विभागीय आयुक्त सर्व ,
७. जिल्हाधिकारी सर्व ,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१०. संचालक, लेखा व कोषागारे ,मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी सर्व ,
१२. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१३. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१४. वित्तिय सल्लागार व उप सचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१५. कार्यासन अधिकारी (म-११/म-३), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई
१७. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ )

शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२१/प्र.क्र. २०३/म-३, दि. ७ मार्च, २०२२ चे सहपत्र

विवरणपत्र-१

(रूपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | शासन निर्णय, दि.०६.१०.२०२१ अन्वये लेखाशीर्ष २२४५ २४५२ अंतर्गत वितरीत केलेला निधी | राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी(रूपये लाखात) (लेखाशीर्ष २२४५ २४५२) | राज्य निधीमधून या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा निधी (रूपये लाखात) (लेखाशीर्ष २२४५ २३०९) | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचा एकूण निधी | एकूण (३+४+५) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | |
| १ | ठाणे | १४२.०० | ०.०० | ६६.३१ | ६६.३१ | २०८.३१ |
| २ | पालघर | ९८.०० | ०.०० | ४६.२१ | ४६.२१ | १४४.२१ |
| ३ | रायगड | २८७.०० | ०.०० | १३३.५९ | १३३.५९ | ४२०.४९ |
| ४ | रत्नागिरी | १८३.०० | २१.१२ | ८२.६४ | १०३.७६ | २८६.७६ |
| ५ | सिधुदूर्ग | १४१.०० | ०.०० | ६०.८२ | ६०.८२ | २०१.८२ |
| **कोकण एकुण** | | **८५१.००** | **२१.१२** | **३८९.५६** | **४१०.६८** | **१२६१.६८** |
| ६ | नाशिक | १.०० | ०.०० | ०.३८ | ०.३८ | १.३८ |
| | **नाशिक एकूण** | **१.००** | **०.००** | **०.३८** | **०.३८** | **१.३८** |
| ७ | पुणे | ३६६.०० | ७.५१ | १७१.७२ | १७९.२३ | ५४५.२३ |
| ८ | सातारा | ८०१.०० | ०.०० | २५५.५२ | २५५.५२ | १०५६.५२ |
| ९ | सांगली | ५२७५.०० | ०.०० | ६६३.२७ | ६६३.२७ | ५९३८.२७ |
| १० | कोल्हापुर | ८५७०.०० | ०.०० | १३३६.१० | १३३६.१० | ९९०६.१० |
| **पुणे एकुण** | | **१५०१२.००** | **७.५१** | **२४२६.६०** | **२४३४.११** | **१७४४६.११** |
| ११ | बुलडाणा | ३७.०० | ०.५२ | १७.५२ | १८.०४ | ५५.०४ |
| १२ | अकोला | ८४३६.०० | ०.०० | ३९३०.९७ | ३९३०.९७ | १२३६६.९७ |
| १३ | वाशिम | १५३.०० | ०.०० | ७१.९५ | ७१.९५ | २२४.९५ |
| १४ | अमरावती | २३९६.०० | ०.०० | ११२५.७७ | ११२५.७७ | ३५२१.७७ |
| १५ | यवतमाळ | ८२९.०० | ०.०० | ३७९.३८ | ३७९.३८ | १२०८.३८ |
| **एकुण अमरावती** | | **११८४१.००** | **०.५२** | **५५२५.५८** | **५५२६.१०** | **१७३६७.१०** |
| १६ | जालना | २००.०० | ०.०० | ९२.९३ | ९२.९३ | २९२.९३ |
| १७ | उस्मानाबाद | १९.०० | ०.०० | ९.१८ | ९.१८ | २८.१८ |
| १८ | नांदेड | ३०३६.०० | ०.०० | १४२७.०१ | १४२७.०१ | ४४६३.०१ |
| १९ | परभणी | ४५४२.०० | ०.०० | २११०.३४ | २११०.३४ | ६६५२.३४ |
| **एकुण औरंगाबाद** | | **७७९७.००** | **०.००** | **३६३९.४६** | **३६३९.४६** | **११४३६.४६** |
| २० | नागपूर | २५०.०० | ०.०० | ११३.४० | ११३.४० | ३६३.४० |
| २१ | चंद्रपूर | ७९९.०० | ०.०० | ३७५.४८ | ३७५.४८ | ११७४.४८ |
| २२ | गडचिरोली | १६.०० | ०.०० | ७.३९ | ७.३९ | २३.३९ |
| **एकुण नागपुर** | | **१०६५.००** | **०.००** | **४९६.२७** | **४९६.२७** | **१५६१.२७** |
| **एकुण राज्य** | | **३६५६७.००** | **२९.१५** | **१२४७७.८६** | **१२५०७.०१** | **४९०७४.०१** |